वित्तीय वर्ष २०२२-२३
मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला अंशदानाची रक्कम वितरित करण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंशदा-२०२२/प्र.क्र.८९/दुवपु-२**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २९ मार्च,२०२३

**संदर्भ- १.** वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४.०४.२०२२
२. शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग समक्रमांक दि.१६.०२.२०२३

**प्रस्तावना :**

मुंबई शहर बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त इमारतींची दुरुस्ती/ पुनर्बांधणी करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८२ अन्वये मुंबई शहर व बेटावरील इमारतींवर दुरुस्ती उपकर आकारला जातो. तसेच कलम ८५ अन्वये तो बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून वसूल करण्यात येतो व एकूण वसुलीच्या ५ टक्के वटावाची रक्कम वगळून उर्वरित रक्कम राज्याच्या एकत्रित निधीत जमा करण्यात येते. दुरुस्ती उपकराची व अंशदानाची रक्कम विनियोजनान्वये, अर्थसंकल्पित करुन ती कलम ८६ (१) व कलम ९७ (१) नुसार मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्यासाठी राज्य शासनाकडून हस्तांतरित करण्यात येते.

**शासन निर्णय :**

मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या अधीनस्त मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्याकरिता दुरुस्ती उपकराच्या रकमेपोटी देण्यासाठी सन २०२२-२३ च्या गृहनिर्माण विभागाच्या खर्चाच्या विवरणपत्रात मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (००) (०२) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता शासकीय अंशदान म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०५९२) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली रु. ३८,००,००,०००/- (रुपये अडोतीस कोटी फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

२. वित्त विभागाने दि. ०४.०४.२०२२ च्या परिपत्रकान्वये नमूद बाबींच्या अधीन सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरणासंदर्भात सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुषंगाने संदर्भांकीत क्र.२ येथील

शासन निर्णयान्वये रू.१५.९६ कोटी एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने सन २०२२-२३ करीता रू.२६.६० कोटी एवढा निधी सुधारीत अंदाजान्वये मंजूर केला आहे. त्यानुषंगाने मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (००) (०२) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता शासकीय अंशदान म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०५९२) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली अंशदानाची रक्कम रुपये १०,६४,००,००० /-( रुपये दहा कोटी चौसष्ट लक्ष फक्त) एवढा निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांना वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील. त्यांनी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८६(१) व कलम ९७ (१) नुसार सदर रक्कम मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळास उपलब्ध करुन द्यावी.

४. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, सादर केल्यानंतर म्हाडाचे नियंत्रक अधिकारी यांनी दुरुस्ती अंशदानाची रक्कम रुपये १०,६४,००,०००/-(अक्षरी- दहा कोटी चौसष्ट लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरित करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३४/व्यय-३ दि.२९.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११२२१५४२८०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GOVIND BALU KAMBLE

Digitally signed by GOVIND BALU KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=9197de2bc674839ebe310a15d6bce1dd2d80cb5d5cef5dd249d0ff0f60e4de9d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=06B02F2B563D12C922A0A07840D85D1C274F61508E2C94E450344568CFDBE0F5, cn=GOVIND BALU KAMBLE
Date: 2023.03.31 12:26:39 +05'30'

**(गोविंद कांबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
३. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, महाराष्ट्र गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१

६. मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, संगणक शाखा, मुंबई.

८. अधिदान व लेखाधिकारी, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे कुर्ला संकुलन, मुंबई-५१ (२ प्रती)

९. अवर सचिव (लेखा कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन) (अर्थोपाय कार्यासन) (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२.

११. अवर सचिव (अर्थसंकल्प-१/रोखशाखा) गृहनिर्माण, मंत्रालय, मुंबई-३२.

१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

१३. निवड नस्ती (दुवपु-२ कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.